जिल्हा पर्यावरण समितीच्या
पुनर्रचनेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यावरण विभाग

### शासन निर्णय क्रमांकः जिपस-२०१४/प्र.क्र.९५ /तां.क-३

१५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ३२
दिनांक: १ सप्टेंबर, २०१५

वाचा :

**१) या विभागाचा शासन निर्णय क्र. जिपस १०९९/प्र.क्र.१०२/तां.क.१ (तां.क.३), दिनांक १ जुलै २००५**

**२) या विभागाचा शासन निर्णय क्र.जिपस २०१०/प्र.क्र.१९/तां.क ४, दिनांक १८ मे २०१०**

प्रस्तावना :

जिल्ह्यातील सर्व जनमानसात पर्यावरण विषयक जनजागृती करण्यासाठी तसेच पर्यावरणाशी संबधित सर्व विभागांशी समन्वयन करुन स्थानिक पर्यावरणीय समस्या शोधून त्यावरील उपाययोजनांची शिफारस करण्यासाठी केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालायाने जिल्हा पातळीवर जिल्हा पर्यावरण समितींचे गठण करण्याबाबत सन १९८८ मध्ये निर्देश दिले होते.

केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाने सन १९८८ मध्ये दिलेल्या निर्देशातील सूचनांनुसार समितीची कार्यकक्षा संदर्भाधिन शासन निर्णयांद्वारे ठरविण्यात आली होती. सन १९८८ नंतर पर्यावरण सद्यस्थिती अहवाल तयार करणे व त्यासाठी आवश्यक तज्ञ मनुष्यबळ या व अनुषंगिक बाबींचा विचार करता कालानुरुप जिल्हा समितीच्या कार्यकक्षांमध्ये बदल करणे आवश्यक झाले आहे. त्या अनुषंगाने प्रशासकीयदृष्ट्या सोयीस्कर व्हावे यासाठी उपरोक्त सर्व संदर्भाधिन शासननिर्णयाद्वारे अधिक्रमित करुन नव्याने जिल्हा पर्यावरण समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जिल्हास्तरावर पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी तसेच पर्यावरणविषयक व्यापक जनजागृतीच्या कार्यक्रमांच्या यशस्वी व सक्षम अंमलबजावणीसाठी स्थापीत जिल्हा पर्यावरण समिती संबधित दि. १ जुलै २००५ व दि. १८ मे २०१० चे शासननिर्णय अधिक्रमित करुन जिल्हा पर्यावरण समितीची रचना व कार्यकक्षा याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**जिल्हा पर्यावरण समितीची रचना:**

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३. | जिल्हा उद्योग अधिकारी | सदस्य |
| ४. | जिल्हा कृषी अधिकारी | सदस्य |
| ५. | जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य |
| ६. | कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग | सदस्य |
| ७. | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम | सदस्य |
| ८. | जिल्हा जनसंपर्क व माहिती अधिकारी | सदस्य |
| ९. | जिल्हा वन अधिकारी | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| १०. | अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेले पर्यावरण क्षेत्रातील तज्ञ २ प्रतिनिधी | सदस्य |
| ११. | अध्यक्षांनी नामनिर्देशित केलेले पर्यावरण क्षेत्रात काम करणाऱ्या जिल्ह्यातील अशासकीय सेवाभावी संस्थेचे २ प्रतिनिधी | सदस्य |
| १२. | जिल्ह्यातील सर्व आमदार | सदस्य |
| १३. | प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ | सदस्य सचिव |

२. शासकीय सदस्यांव्यतिरिक्त इतर सदस्यांच्या समितीमधील सदस्यत्वाचा कालावधी हा दोन वर्षांसाठी असेल. दोन वर्षानंतर समितीचे अध्यक्ष त्यांच्या स्तरावर सदस्यांचे नवीन नामनिर्देशन करतील,नामनिर्देशनाच्या संबंधात आवश्यकतेनुसार समितीचे अध्यक्ष, पालकमंत्र्यांचे मार्गदर्शन प्राप्त करतील आणि सुधारीत समिती गठणाच्या आदेशाची प्रत शासनास सादर करतील.

३. अध्यक्षांना आवश्यक वाटल्यास ते जिल्ह्यातील इतर लोकप्रतिनिधींना व इतर शासकीय अधिकाऱ्यांना स्थानिक विषयाच्या निकडीनुसार आमंत्रित करु शकतील.

४. जिल्ह्याचे पालकमंत्री सदर समितीच्या कामाचा आढावा प्रत्येक वर्षी किंवा आवश्यकतेनुसार वेळोवेळी घेतील व गरज भासल्यास समितीस त्यांच्या स्तरावरुन मार्गदर्शनसुध्दा करतील. प्रधान सचिव (पर्यावरण) हे या समित्यांचा आढावा वर्षातून एकदा घेतील.

५. सदर समिती राज्यशासनाच्या पर्यावरण विभागाची जिल्हास्तरावरील प्रतिनिधी समिती म्हणून काम करेल. पर्यावरण विभागास जिल्हास्तरावर पर्यावरण संवर्धनाच्या कार्यक्रमात संपूर्ण सहकार्य करेल तसेच समितीने जिल्हास्तरावर केलेल्या कार्यवाहीची माहिती पर्यावरण विभागास वेळोवेळी सादर करेल.

**समितीचे कामकाज व कार्यकक्षा:**

अ) जिल्ह्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांनी तयार केलेल्या पर्यावरण सद्यस्थिती अहवालावर सखोल चर्चा करून शिफारसी करणे व असा अहवाल प्रत्येक स्थानिक स्वराज्य संस्थाकडून प्राप्त करून घेणे.

आ) जिल्ह्यातील पर्यावरणाचा ऱ्हास झालेल्या नैसर्गिक संसाधनांचे सर्वेक्षण करुन अशा संसाधनांच्या संवर्धनासाठी शासनास शिफारस करणे व शासनाच्या मान्यतेने उपाययोजनांच्या अंमलबजावणीसाठी संनियंत्रण करणे.

इ) जिल्हास्तरावर पर्यावरण दिन, वसुंधरा दिन, जलसाक्षरता दिवस, ओझोन संरक्षण दिवस, वेटलॅण्ड कॉन्झर्व्हेशन दिवस, वृक्षारोपण मोहिम, प्लॅस्टिक निर्मूलन मोहिम, प्लॅस्टिक पिशव्यांच्या बंदीबाबत जनजागृती, शाळा-कॉलेजांमध्ये पर्यावरण शिक्षण व जनजागृती स्पर्धा व कार्यक्रम इ राबविण्यासाठी पर्यावरण विभागामार्फत निर्गमित मार्गदर्शक सूचनानुसार तसेच स्थानिक पर्यावरणीय बाबी लक्षात घेऊन अंमलबजावणी करणे.

ई) पर्यावरण विभागामार्फत जिल्ह्यात कार्यरत असलेल्या योजनांच्या योग्य त्या अंमलबजावणीसाठी, विभागामार्फत योजनानिहाय वा एकत्रित स्वरुपात निर्गमित सूचनांनुसार कार्यवाही करणे.

उ) जिल्ह्यातील नव्याने प्रस्थापित होणाऱ्या विकास प्रकल्पासाठी तयार करण्यात येणाऱ्या " पर्यावरण आघात मूल्यांकन अहवाल" व "जनसुनावणी" बाबत संबधित प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण

नियंत्रण मंडळ यांनी समितीस सूचित करावे. यानुसार समितीने आपली मते जनसुनावणी दरम्यान आवश्यकतेनुसार विहीत कार्यपद्धतीने नोंदवावी.

च) सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या विकास योजना/प्रकल्पांमुळे होणाऱ्या जिल्ह्यातील पर्यावरण ऱ्हासावर उपाययोजना शासनास सुचविणे व शासनाच्या निदेशानुसार त्यावर अंमलबजावणी करणे.

छ) पर्यावरण संरक्षण कायदा, १९८६ अंतर्गत निर्गमित करण्यात आलेल्या अधिसूचना क्र. एसओ-३९४ (ई), दि.१६.४.१९८७ अन्वये जिल्हाधिकारी यांना प्रदान केलेले अधिकार, जिल्हाधिकारी, समितीचे अध्यक्ष या नात्याने, जिल्हा स्तरावर पर्यावरण संरक्षणासाठी व संवर्धनासाठी आवश्यकतेनुसार वापरतील, तसेच पर्यावरण ऱ्हासास कारणीभूत ठरत असलेल्या/ ठरणा-या घटकांवर/संस्थांवर या कायद्यान्वये प्राप्त अधिकारांनुसार, समितीचे अध्यक्ष कारवाई करतील किंवा कारवाई करण्यासाठी शासनाच्या पर्यावरण विभागास शिफारस करतील.

ज) समिती पर्यावरण ऱ्हासाबाबत प्राप्त होणाऱ्या तक्रारीची स्थानिक पातळीवर त्वरीत दखल घेईल व त्यासाठी आवश्यक ती कार्यवाही संबंधित यंत्रणांच्या माध्यमातून करेल.

६. सदर समितीची बैठक कमीत कमी सहा महिन्यांतून एकदा होईल. सदर बैठक साधारणत: जानेवारी आणि मे महिन्यात आयोजित करण्यात यावी. तसेच बैठकीचे इतिवृत्त पर्यावरण विभागास सादर करण्यात यावे.

७. समितीच्या कामकाजाच्या कार्यपध्दतीबाबत काही मतभेद अथवा वाद निर्माण झाल्यास अशा प्रसंगी प्रधान सचिव (पर्यावरण) यांचा निर्णय अंतिम राहील.

८. शासकीय सदस्यांना प्रवास भत्ता व दैनिक भत्ता हा महाराष्ट्र शासनाच्या वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार देय राहील. प्रस्तुत समिती ही जिल्हाधिकारी यांच्या कक्षेतील असल्यामुळे या समितीसंबंधी जो खर्च होईल तो खर्च जिल्हाधिकारी यांना त्यांच्या मंजूर अनुदानातून भागवावा लागेल. त्यामुळे याबाबतच्या खर्चाचे लेखाशिर्ष जिल्हाधिकारी यांच्या आस्थापनेनुसार राहील व त्याबसंबंधीची तरतूद जिल्हाधिकारी यांनी करावी.

९. वित्तीय बाबी संदर्भाधीन शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. सीआर-४५/९०/व्यय-१६ दिनांक ३ ऑगस्ट १९९० अन्वये निर्गमित करण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७०२१६१०११२२०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2015.09.24 16:42:10 +05'30'

**(सो. ना. बागूल)**
उप सचिव, पर्यावरण विभाग
महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद /विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
३. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव,

४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
५. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
६. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
७. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
८. सर्व विभागीय आयुक्त
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा
११. सर्व आयुक्त, महानगरपालिका
१२. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१३. खाजगी सचिव, सर्व मंत्री
१४. सर्व पालक मंत्र्यांचे खाजगी सचिव
१५. मा. मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
१६. मा. राज्यमंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१९. संचालक, उद्योग संचालनालय,
२०. आयुक्त, कृषी-पुणे
२१. महासंचालक आरोग्य संचालनालय,मुंबई
२२. महासंचालक/संचालक, जनसंपर्क व माहिती संचालनालय, मुंबई
२३. सर्व विभागीय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
२४. सर्व विभागीय मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
२५. सर्व जिल्हा वन संरक्षक अधिकारी
२६. सर्व कार्यासने, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
२७. निवड नस्ती